**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास मदत वाहिनी (हेल्पलाईन) या योजनेकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-अविवि-२०२३/प्र.क्र.१४३/का-९,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : २२ मार्च, २०२४.

**वाचा:-** (१) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि २००९/प्र.क्र.५७/०९/का-१ दि.५ फेब्रुवारी,२००९.

(२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२एप्रिल,२०२३.

(३) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग अविवि २०२३/प्र.क्र.१४३/का-०९ दि.११ सप्टेंबर २०२३

(४) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/हेल्पलाईन/प्र.क्र.३७/ २०२४/का-२ दि.६ फेब्रुवारी, २०२४.

(५) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/संकिर्ण/प्र.क्र.१६६/२०२४/का-३ दि.१८.३.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयामध्ये अल्पसंख्याक समुदायातील लोकांना शासकीय कामकाजाबाबत वेळोवेळी उद्भवणाऱ्या अडचणीबाबत मार्गदर्शन करण्यासाठी व शासनाने अल्पसंख्याक समाजासाठी सुरु केलेल्या विविध योजनांबाबत लोकांच्या शंकाचे निरसन करण्यासाठी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या कार्यालयात एक हेल्पलाईन सुविधा योजना कार्यान्वित करण्यात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित निधीपैकी उपलब्ध निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २००, इतर कार्यक्रम राज्य योजनांतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहायक, (०१) (११) मदत वाहीनीकरीता सहायक अनुदान (२२३५ ए १७८) (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता रु.१० लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. माहे त्यापैकी वित्त विभागाने संदर्भ क्र.२ शासन परिपत्रक दि.४ एप्रिल,२०२२ अन्वये डिसेंबर २०२३ अखेरपर्यंत अर्थसंकल्पित निधीच्या ७० % मर्यादेपर्यंत अनुदान वितरीत करण्यासाठी मान्यता देण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने हेल्पलाईन योजनेकरीता निधी वितरणाची मागणी केलेली आहे. त्यास अनुसरुन या योजनेकरीता वित्त विभागाने उपलब्ध

करून दिलेले रु.२,००,०००/-(अक्षरी रूपये दोन लक्ष फक्त) एवढे अनुदान मंजूर करून वितरीत करण्यात आले होते. आता संदर्भ क्र. ४ व ५ च्या पत्रान्वये अल्पसंख्याक आयोगाने मागण केल्यानुसार सदर योजनेकरीता **रु.३,१४,१८८/- (अक्षरी रुपये तीन लक्ष चौदा हजार एकशे अट्टाऐशी फक्त)** ऐवढे वेतनेतर अनुदान खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास हेल्पलाईन या योजनेकरीता वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पीय अनुदान (रु.) | २०२३-२४ या आर्थिक वर्षात सुधारीत अर्थसंकल्पिय तरतुद | सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी (रूपये) | माहे मार्च, २०२४ या महिन्याकरीता वेतनेतर बाबींकरीता वितरित करावयाचा निधी (एकूण रूपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) | १०,००,०००/- | ७,००,०००/- | २,००,०००/- | ३,१४,१८८/- |
| | **एकूण** | **१०,००,०००/-** | **७,००,०००/-** | **२,००,०००/-** | **३,१४,१८८/-** |
| | | | | | **(अक्षरी रुपये तीन लक्ष चौदा हजार एकशे अठ्याऐंशी फक्त)** |

२. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी तर अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२३-२४ च्या मासिक निधी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेपर्यंतच करावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच संदर्भ क्र.२ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतुदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे.तसेच सदर वितरीत निधी बाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत केले जाणार नाही.

३. उपरोक्त रक्कम "मागणी क्रमांक झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम , राज्य योजनांतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय (०१) (११) मदत सेवेकरीता सहायक अनुदान २२३५ ए १७८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर )" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

४. " सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १२

एप्रिल, २०२३ मधील परिच्छेद व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अटींची पुर्तता होत असून प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. ”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१२३८५५२८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2024.03.26 12:48:27 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,

३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,

६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

७) संचालक, लेखा व कोषागारे

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

१२) कक्ष अधिकारी (का. ७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१३) निवडनस्ती (कार्यासन-९).